**इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत अनुदानित आश्रमशाळांकरीता स्वतंत्र कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीच्या विकसन व देखभालीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक विभशा-२०२५/प्र.क्र.८६/विजाभज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- ०५ मे, २०२५.

**वाचा:-**
१) शासन पत्र, वित्त विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.२७/कोषाप्रशा-४,दिनांक ०९.०८.२०१८ व दिनांक ०३.११.२०१८.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.सेवार्थ-२०१९/प्र.क्र.२५/विजाभज-१, दि.१८ मे, २०२३.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग, क्रमांक मातंसं २०२२/प्र.क्र.४७/ से-२/३९, दि.२७ सप्टेंबर, २०२२.
४) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.विभशा-२०२४/प्र.क्र.११३/विजाभज-१, दि.३१ मे, २०२४.
५) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्र.विभशा-२०२४/प्र.क्र.११३/विजाभज-१, दि.०७ जुन, २०२४.
६) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाचे पत्र क्रमांक MH-IT/OW/०३२४/००६८१, दि.२४.०३.२०२५
७) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान), क्र. मातंस-२०२२/प्र.क्र.४१/से-२, दि.२७.१२.२०२४
८) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांचे परिपत्रक क्र.MH-IT/OW/१२२३/०२७४३, दि.२७.१२.२०२४

**प्रस्तावना:-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत अनुदानित आश्रमशाळांकरीता स्वतंत्र कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणाली विकसित करणे व सदर प्रणालीचे देखभाल करण्याचे काम महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून करुन घेण्यात येते.

**२.** सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील दि.०१.०४.२०२४ ते दि.३१.०३.२०२५ या एक वर्षाच्या कालावधीसाठी सदर प्रणालीकरीता आवश्यक असणारे तांत्रिक मनुष्यबळ माहिती तंत्रज्ञान महामंडळून उपलब्ध करुन घेण्यासाठी संदर्भ क्र.५ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर मान्यता कालावधी दिनांक ३१ मार्च, २०२५ रोजी संपुष्टात आला असून, विभागाच्या कस्टमाईज्ड प्रणालीचे कामकाज पुढे चालू ठेवण्याकरीता आवश्यक असणाऱ्या तांत्रिक मनुष्यबळाची सेवा सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध करुन घेण्यासाठी मान्यता देण्याचे महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून संदर्भ क्र.६ अन्वये कळविण्यात आले आहे.

**३.** महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाच्या संदर्भ क्र.६ येथिल पत्रातील प्रस्तावानुसार, इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत चालविण्यात येत असलेल्या विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित आश्रमशाळांतील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वेतन विषयक कामकाजासाठी स्वतंत्र कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीच्या विकसन व देखभालीबाबत मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

शासनाच्या वित्त विभाग, संदर्भ क्र.१, दि.०३.११.२०१८ च्या पत्रातील सूचनेनुसार सर्व शासकीय विभागांच्या कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीचे कामकाज महाआयटी यांचेकडून करुन घेणे आवश्यक आहे. इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या खाजगी अनुदानित विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व अनुषंगिक सेवांसाठी कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीच्या विकसन व देखभाल करण्यासाठी आणि सदर प्रणाली सुरळीत सुरु राहण्यासाठी वित्त विभागाच्या उक्त पत्रातील सूचनेनुसार सन २०२४-२५ च्या धर्तीवर सन २०२५-२६ या वर्षात खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे तांत्रिक मनुष्यबळ महाआयटी यांचेकडून उपलब्ध करून घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| Sr.No | मनुष्यबळाचा तपशील (Manpower Description) | पदसंख्या (No. of person) |
|---|---|---|
| | **१००% Dedicated Associates** | |
| १ | Sr. Software Developer | १ |
| २ | Software Developer | १ |
| ३ | IT Office Assistant | १ |
| | **२०% Shared Associates** | |
| १ | Sr. Technical Manager | १ |
| २ | Project Lead | १ |
| ३ | Business Analyst | १ |
| ४ | Network Specialist | १ |
| ५ | Database Administrator | १ |
| ६ | Software Tester | १ |
| ७ | IT Office Assistant | १ |

**२.** सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांचेकडून उक्त सेवेसाठी शासन निर्णय, संदर्भ क्र. २ अन्वये दर घोषित करण्यात आले असून मुद्दा क्र.२ मध्ये "परिशिष्ट –ब येथील दर दि.३०.०९.२०२३ पर्यंत वैध राहतील, त्यानंतर निविदेतील ५.९(२) येथील तरतूदीनुसार यानंतरच्या प्रत्येक वर्षाच्या सुरुवातीला आधारभूत दरपत्रकामधील प्रत्येक पदनामाचा दर ८ टक्क्यांनी वाढवून सुधारीत करण्यात येतील आणि सदर दर त्या वर्षाचा आधारभूत दर गणला जाईल." अशी तरतूद नमूद आहे. त्यानुसार संदर्भ क्र. ७ येथील सामान्य प्रशासन विभाग (माहिती तंत्रज्ञान) यांचे पत्र तसेच संदर्भ क्र. ८ येथे नमूद महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ यांचे परिपत्रकान्वये दि.०१.१०.२०२४ ते दि.३०.०९.२०२५ या कालावधीकरीता प्रत्येक पदनामानुसार दर ८ टक्के वाढवुन सुधारीत दरपत्रक निर्गमित करण्यात आले आहे. त्यानुसार या विभागाने सेवार्थ प्रणाली विकसनासाठी उपलब्ध करुन घेतलेल्या परिच्छेद क्र.१ येथे नमूद तांत्रिक मनुष्यबळासाठी खालील अटींच्या अधीन महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळास मोबदला देण्यात येईल.

१) सदर आदेश दि.०१.०४.२०२५ ते दि.३१.०३.२०२६ या एक वर्षाच्या कालावधीसाठी लागू असतील.

२) माहिती तंत्रज्ञान महामंडळाने DCPS/NPS/निवृत्तीवेतन मोड्युल विकसन इ. संबंधीचे कामकाज उपरोक्त नमूद कालावधीत पुर्ण करणे आवश्यक राहील, त्यानुषंगाने झालेल्या कामकाजाचा प्रगती अहवाल दर पंधरवाड्यात या विभागास सादर करावा.

३) सदर आदेशाच्या अनुषंगाने विभागामार्फत महामंडळास वेळोवेळी नेमून दिलेल्या Key Performance Indicators च्या पुर्ततेचा अहवाल दर पंधरवाड्यात या विभागास सादर करणे आवश्यक राहील.

४) या आदेशान्वये मान्यता दिलेल्या प्रत्येक तांत्रिक मनुष्यबळाकडून केलेल्या कामकाजाचा प्रगती अहवाल महामंडळास दर पंधरवाड्यात विभागास सादर करणे आवश्यक राहील.

**३.** उपरोक्त तांत्रिक मनुष्यबळावर होणारा खर्च मागणी क्र. झेडजी-२, २२५१-सचिवालयीन-सामाजिक सेवा, (०९०) सचिवालय, (०१) ई-गव्हर्नन्स प्रकल्प राज्य योजना, (०१)(०१) ई-शासन प्रकल्पाची अंमलबजावणी (२२५११३३४) (कार्यक्रम), १७-संगणक खर्च या लेखाशिर्षाखालील सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

**४.** इतर मागास बहुजन कल्याण विभागाच्या अधिनस्त स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणाऱ्या खाजगी अनुदानित विजाभज प्रवर्गाच्या निवासी आश्रमशाळांतील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व अनुषंगिक सेवांसाठी कस्टमाईज्ड सेवार्थ प्रणालीच्या विकसन, देखभाल व आवश्यक त्या सुधारणा वेळोवेळी करण्याची तसेच, सदर प्रणालीमध्ये काम करतांना वेळोवेळी येणाऱ्या तांत्रिक अडचणींचे तात्काळ निराकरण करण्याची सर्व कार्यवाही महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाने करणे आवश्यक राहिल.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०५०५१८२६३८४४३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2025.05.05 18:27:25 +05'30'

**(कैलास साळुंके)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

६) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

७) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१२) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१३) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१४) लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) उप सचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ मर्यादित, दालन क्र.५१४, मंत्रालय, विस्तार, मुंबई.
१९) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) निवडनस्ती (विजाभज-१).